**राज्य सांस्कृतिक निधीमध्ये राज्य शासनाचा सन २०२३-२४ या वर्षाचा रुपये १२.१८ लक्षाचा हिस्सा वर्ग करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : रासांधो ५५२४(१२)/प्र.क्र.१७/अर्थसं.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :** १)शासन निर्णय, क्र. मसांधो २०१०/रासानि २०११/प्र.क्र.१२२/अर्थसं. दिनांक ९ ऑगस्ट, २०१२
२) शासन निर्णय, क्र. मसांधो २०१०/रासानि २०११/प्र.क्र.१२२/अर्थसं. दिनांक ३० जानेवारी, २०१३
३) शासन निर्णय क्र. रासांनि २०१२/पुरक/प्र.क्र.५२/अर्थसं, दिनांक २८ मार्च, २०१३
४) शासन निर्णय, क्र. रासांधो ५२१३/१२/प्र.क्र.६१/अर्थसं. दिनांक ५ फेब्रुवारी, २०१४
५) शासन निर्णय, क्र. रासांनि ५५१६/प्र.क्र.८/अर्थसं, दिनांक २९ मार्च, २०१६
६) शासन निर्णय, क्र. रासांनि ५५१७/प्र.क्र.१२/अर्थसं, दिनांक ३० मार्च, २०१७
७) शासन निर्णय, क्र. रासांनि ५५२२(१२)/प्र.क्र.०२/अर्थसं, दिनांक २०जानेवारी,२०२२
८) शासन निर्णय, क्र. रासांनि ५५२२(१२)/प्र.क्र.०२/अर्थसं, दिनांक १५ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना :-**

राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त संदर्भ-१ येथील शासन निर्णयान्वये राज्य सांस्कृतिक धोरण, २०१० जाहिर करण्यात आलेले आहे. सदरच्या निधीचा विनियोग कोणत्या बाबींसाठी करावा, याबाबतची नियमावली संदर्भ-२ येथील शासन निर्णयान्वये तयार करण्यात आली आहे.सदरहू निधीमध्ये ₹२.५० कोटी इतका निधी शासनाचा हिस्सा म्हणून जमा करावयाचा आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यात आला आहेः-

| अ.क्र. | शासन निर्णय दिनांक | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | दि. २८.३.२०१३ | १,००,००,०००/- |
| २ | दि. ५.२.२०१४ | २५,००,०००/- |
| ३ | दि. २९.३.२०१६ | ३५,००,०००/- |
| ४ | दि. ३०.३.२०१७ | ४०,००,०००/- |
| ५ | दि. २०.१.२०२२ | २०,००,०००/- |
| ६ | दि. १५.२.२०२३ | १२,६०,०००/- |

असा एकूण ₹२,३२,६०,०००/- इतका शासनाच हिस्सा वर्ग करण्यात आला असून, उर्वरित १७,४०,०००/- इतका निधी वितरीत करावयाचा आहे. मात्र, सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात ₹१२.१८ लक्ष इतका रक्कम राज्य सांस्कृतिक निधीमध्ये वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये "महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक निधी, मुंबई, मंत्रालय" या निधीमध्ये राज्य शासनाचा हिस्सा ₹१२,१८,०००/- (रुपये बारा लक्ष अठरा हजार फक्त) वर्ग करण्यासाठी सदर शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. "महाराष्ट्र राज्य सांस्कृतिक निधी, मुंबई, मंत्रालय" या न्यासासाठी बँक ऑफ महाराष्ट्र या राष्ट्रीयकृत बँकेत उघडण्यात आलेल्या चालू खाते क्र. ६०१२७७७०७६३ मध्ये राज्य शासनाचा हिस्सा जमा करण्यात यावा.

३. राज्य शासनाचा सदर हिस्सा हा मागणी क्र. झेडडी-२, मुख्यलेखाशीर्ष २२०५-कला व संस्कृती (०१) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे, (०१) (०४) राज्य सांस्कृतिक निधी, (२२०५ ३३५९) - ३१ सहाय्यक अनुदान या योजनेखालील सन २०२३-२४ च्या मंजूर तरतूदीतून बँक ऑफ महाराष्ट्राच्या उपरोक्त नमूद खात्यामध्ये वर्ग करण्यात यावा.

४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, लेखाधिकारी,सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना संबंधीत देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३३१२१५४५००५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षां कित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.31 22:05:12 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (वित्त) अथवा त्यांचा प्रतिनिधी (सनियंत्रण समिती सदस्य या नात्याने)
४. सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक
५. उप सचिव (सां.का.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई (सनियंत्रण समिती सदस्य या नात्याने तथा नियंत्रण अधिकारी या नात्याने)
६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय (सनियंत्रण समितीचे सदस्य सचिव या नात्याने)
७. संचालक, पुरातत्व व वस्तूसंग्रहालय संचालनालय (सनियंत्रण समितीचे सदस्य सचिव या नात्याने)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता), मुंबई
९. लेखा व कोषाधिकारी, मुंबई
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. अवर सचिव, नियोजन विभाग (कार्या.१४४४), मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव, वित्त विभाग (अर्थसं ११/व्यय-१५), मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती, अर्थसंकल्प